अर्थसंकल्पिय अनुदान सन २०१८-२०१९
" २२१५ पाणीपुरवठा व स्वच्छता १९६, जिल्हा परिषद, पंचायत संस्थांना सहाय्य- महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१, याच्या कलम १८३ अन्वये जिल्हा परिषदांना आस्थापना अनुदाने - (स्थानिक क्षेत्र) (०१)(०५) नियमित आस्थापना
(२२१५ १८८१) " मागणी क्रमांक वाय-२

## महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन निर्णय क्रमांकः बजेट-१४१८/प्र.क्र.११६/पापु-२३

गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल, ७ वा मजला
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
तारीख: ३ ऑक्टोबर, २०१८

<u>वाचा :-</u>

1) **शासन निर्णय क्रमांकः अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक २ एप्रिल,२०१८**
2) **शासन निर्णय क्रमांकः बजेट-१४१८/प्र.क्र.११६/पापु-२३, दि. २ जुलै, २०१८**
3) **शासन निर्णय क्रमांकः बजेट-१४१८/प्र.क्र.११६/पापु-२३, दि. १० ऑगस्ट, २०१८**
4) **शासन निर्णय क्रमांकः बजेट-१४१८/प्र.क्र.११६/पापु-२३, दि. २० ऑगस्ट, २०१८**

<u>प्रस्तावना :-</u>

जिल्हा परिषदेमधील ग्रामीण पाणी पुरवठा विभागाच्या आस्थापनेवरील वेतनेतर खर्च भागविण्यासाठी मागणी क्रमांक वाय-२ "२२१५, पाणीपुरवठा व स्वच्छता १९६, जिल्हा परिषद/पंचायत संस्थांना सहाय्य (जिल्हा स्तर) (०१) जिल्हा परिषद/पंचायत संस्थांना सहाय्य महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१, च्या कलम १८३ अन्वये जिल्हा परिषदांना आस्था़पना अनुदाने-(स्थानिक क्षेत्र) (०१) (०५) नियमित आस्थापना (२२१५ १८८१)" या लेखाशिर्षाखाली वित्तीय वर्ष २०१८-२०१९ करिता ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) साठी रुपये १०,२३,२८,०००/- इतकी अर्थसंकल्पिय तरतूद करण्यात आली आहे.

२. वित्त विभागाच्या दिनांक २.४.२०१८ च्या शासन निर्णयामधील विहित अटी व शर्तीची पूर्तता करणा-या जिल्हा परिषदांना चालू आर्थिक वर्षात उपरोक्त लेखाशिर्षांतर्गत निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

## शासन निर्णय:-

जिल्हा परिषदेमधील ग्रामीण पाणी पुरवठा विभागाच्या आस्थापनेवरील वेतनेतर खर्च भागविण्यासाठी सन २०१८-१९ या वित्तीय वर्षासाठी “२२१५, पाणीपुरवठा व स्वच्छता १९६, जिल्हा परिषद/पंचायत संस्थांना सहाय्य (जिल्हा स्तर) (०१) जिल्हा परिषद/पंचायत संस्थांना सहाय्य महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१, च्या कलम १८३ अन्वये जिल्हा परिषदांना आस्थापना अनुदाने-(स्थानिक क्षेत्र) (०१)(०५) नियमित आस्थापना (२२१५ १८८१)” या लेखाशिर्षाखाली ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) या उद्दीष्टाखाली रुपये ८२,००,०००/- याप्रमाणे (अक्षरी रुपये ब्याऐंशी लाख फक्त ) इतके अनुदान पुढीलप्रमाणे संबंधित जिल्हा परिषदांना वितरीत करण्यात येत आहे.

| अ. क्र. | जिल्हयाचे नाव | सन २०१८-१९ करीता लेखाशिर्ष २२१५१८८१ खाली वितरीत करण्यात येत असलेले वेतनेतर अनुदान | या शासन निर्णयान्वये लेखाशिर्ष २२१५१८८१ खाली वितरीत करण्यात येत असलेले वेतनेतर अनुदान (अक्षरी रुपये) |
|---|---|---|---|
| १ | **पुणे** | ३४००००० | रूपये चौतीस लाख फक्त |
| २ | **सोलापूर** | २३००००० | रूपये तेवीस लाख फक्त |
| ३ | **बुलढाणा** | ११००००० | रूपये अकरा लाख फक्त |
| ४ | **भंडारा** | १४००००० | रूपये चौदा लाख फक्त |
| **एकूण** | | ८२००००० | रूपये ब्याऐंशी लाख फक्त |

उपरोक्त लेखाशीर्षांतर्गत सन २०१७-१८ चा अखर्चित निधी शासनास जमा करण्याच्या अधीन उपरोक्त निधी वितरीत करण्यात येत असून, अखर्चित निधी शासनास जमा केल्याशिवाय निधी कोषागारातून आहरित करण्यात येऊ नये. उपरोक्त निधी संबंधित जिल्हा परिषदांनी प्रवास खर्च, कार्यालयीन खर्च, भाडेपट्टी, पेट्रोल/तेल/वंगण या बाबींसाठी आवश्यकतेनुसार वापरावा.

२. या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेले अनुदान शासनाने वेळोवेळी विहित केलेल्या अटी व शर्तीच्या अधिन राहील. वितरीत केलेल्या रकमांपेक्षा अधिक खर्च होणार नाही याची दक्षता सर्व संबंधित आहरण व संवितरण अधिकारी यांनी घ्यावी. तसेच सदर निधी ज्या प्रयोजनासाठी वितरीत केला आहे त्याच प्रयोजनासाठी खर्च होईल याचीही दक्षता घेण्यात यावी.

३. सदर शासन निर्णयान्वये तसेच यापूर्वी वितरित केलेल्या निधीची उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर केल्याची खात्री करुनच पुढील आवश्यक निधीची मागणी करण्याची दक्षता घेण्यात यावी. पुढील मागणीपत्र प्राप्त झाल्याशिवाय निधी वितरीत केला जाणार नाही याची संबंधित जिल्हा परिषदांनी नोंद घ्यावी.

५. शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांक अर्थसं-२०१८/ प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक २ एप्रिल, २०१८ अन्वये प्रशासकीय विभागांना दिलेल्या अधिकारात सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहेत. या परिपत्रकान्वये नमूद केलेल्या अटी व शर्तींची पूर्तता होत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१००११८२२४८१०२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Balasaheb B Hajare

Digitally signed by Balasaheb B Hajare
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=49ad4eefa4101394c1b1119b5f2d93940a592bd8a91d2970b24702e05968e19f, cn=Balasaheb B Hajare
Date: 2018.10.03 10:35:29 +05'30'

**बाळासाहेब बा.हजारे**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा. विधानसभा / विधान परिषद, सर्व
२. विभागीय आयुक्त, सर्व
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, ( पुणे, सोलापूर, बुलढाणा, भंडारा )
४. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई
५. संचालक, भूजल सर्वेक्षण विकास यंत्रणा, पुणे
६. मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, ( पुणे, सोलापूर, बुलढाणा, भंडारा )
७. प्रादेशिक मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (सर्व)
८. जिल्हा पाणी पुरवठा अधिकारी तथा अधिक्षक अभियंता महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (सर्व)
९. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद ( पुणे, सोलापूर, बुलढाणा, भंडारा )

१०. महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई (लेखा परिक्षा)
११. महालेखापाल, महाराष्ट्र-२ नागपूर (लेखा परिक्षा)
१२. जिल्हा कोषागार अधिकारी, ( पुणे, सोलापूर, बुलढाणा, भंडारा)
१३. उप अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा उप विभाग, जिल्हा परिषद ( पुणे, सोलापूर, बुलढाणा, भंडारा)
१४. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई
१५. वित्त विभाग, (व्यय-३ व अर्थ-१९)
१६. कार्यासन क्रमांक पापु-०४ व पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
१७. ग्राम विकास व जलसंधारण विभाग
१८. निवड नस्ती कार्यासन पापु-२३